**शासकीय निवासस्थानात अनुज्ञेय कालावधीनंतरही अधिक वास्तव्य करण्याबद्दल दंडनीय दराने अनुज्ञप्ती शुल्क आकारणी करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१३/प्र.क्र.९६/मिव्य-२,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १५ जून, २०१५.

वाचा : १. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक : आरएलएफ-१०८३/३६९८/सीआर-१०५-मिव्य-२, दिनांक २३.१२.१९८५ व दिनांक २८.०२.१९८६.
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : टिआरएफ-२०००/प्र.क्र.३/बारा, दिनांक ६ ऑगस्ट, २००२.
३. शासन निर्णय, आदिवासी विकास विभागाच्या क्र. आस्था १७०१/प्र.क्र.४३/ कार्यासन १५, दि.०६.०५.२००२.
४. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : शानिवा-१५९३/४४३३/ प्र.क्र.६६७/९३/२३-अ, दिनांक ५ नोव्हेंबर, १९९३.

**प्रस्तावना :**

शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या बदलीनंतर, सेवानिवृत्तीनंतर, शासन सेवेत असताना त्यांचे निधन झाल्यास अथवा अन्य कारणास्तव निवासस्थानात अनुज्ञेय कालावधीनंतरही अधिक वास्तव्य करण्याबद्दल सार्वजनिक बांधकाम विभागाचा क्र. आरएलएफ १०८३/३६९८/प्र.क्र.१०५/मिव्य २, दि. २३.१२.१९८५ च्या शासन निर्णयान्वये दंडनीय दराने अनुज्ञप्ती शुल्काचे दर निश्चित करण्यात आले होते. त्यास समक्रमांकच्या दिनांक २८.०२.१९८६ च्या शासन निर्णयान्वये पुढील आदेश मिळेपर्यंत स्थगिती देण्यात आली आहे. या निर्णयाच्या अनुषंगाने फेरविचार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.आरएलएफ-१०८३/ ३६९८/ सीआर-१०५-मिव्य-२, दिनांक २३ डिसेंबर, १९८५ व दिनांक २८ फेब्रुबारी, १९८६ या शासन निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत आहेत.

२. हा शासन निर्णय बृहन्मुंबई व्यतिरिक्त उर्वरित महाराष्ट्रातील या विभागाच्या अखत्यारितील शासकीय निवासस्थानांसंदर्भात लागू असेल.

३. विशिष्ट परिस्थितीत शासन निर्णयान्वये मंजूरी दिली असल्याखेरीज कोणत्याही शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना एकापेक्षा अधिक शासकीय निवासस्थाने एकाच वेळी ताब्यात ठेवता येणार नाही.

४. बृहन्मुंबई व्यतिरिक्त राज्यातील अन्य ठिकाणी असलेल्या शासकीय निवासस्थानात राहणा-या शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या राजीनामा / सेवानिवृत्ती / स्वेच्छानिवृत्ती इत्यादीच्या दिनांकाबाबत माहिती, शासकीय अधिकारी/कर्मचारी ज्या प्रशासकीय विभाग/कार्यालयाच्या नियंत्रणाखाली आहेत, त्या विभाग/कार्यालयाने तसेच संबंधित शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांनी सदर घटनेच्या किमान एक महिना आधी संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या निदर्शनास आणावी.

५. शासकीय निवासस्थानात राहणा-या शासकीय अधिकारी/कर्मचारी यांची अन्य ठिकाणी बदली झाल्यास किंवा त्यांना सेवेतून काढून टाकल्यास किंवा त्यांनी त्याच गावात/शहरात स्वत:च्या/कुटुंबियांच्या मालकीचे राहण्यास घर घेतल्यास अथवा त्यांचे निधन झाल्यास सदर घटनेच्या दिनांकासह माहिती ते ज्या प्रशासकीय विभाग/कार्यालयाच्या नियंत्रणाखाली आहेत त्या विभाग/कार्यालयाने तात्काळ संबंधित जिल्हा

निवास वाटप समितीच्या अध्यक्षांच्या व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या निदर्शनास आणावी.

६. उपरोक्त परिच्छेद क्रमांक ४ व ५ मध्ये नमूद केलेल्या घटना तात्काळ संबंधित जिल्हा निवास वाटप समितीच्या अध्यक्षांना व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या, तसेच संबंधित शासकीय अधिकारी/कर्मचारी ज्या प्रशासकीय विभाग/कार्यालयाच्या नियंत्रणाखाली आहेत, त्या विभाग/कार्यालयाच्या प्रमुखांच्या निदर्शनास आणण्याची जबाबदारी संबंधित शासकीय अधिकारी/कर्मचारी यांची असेल. सदर घटना संबंधित प्रशासकीय विभाग/कार्यालयाने संबंधित जिल्हा निवास वाटप समितीच्या अध्यक्षांना व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांना त्वरीत कळविणे बंधनकारक असेल. तसेच, शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचा राजीनामा किंवा सेवानिवृत्ती किंवा स्वेच्छानिवृत्ती किंवा त्यांची बदली झाल्यास संबंधित शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्याकडून सदर घटनेच्या दिनांकापूर्वी किमान सात दिवस आधी अथवा शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना सेवेतून काढून टाकल्यास किंवा त्यांचे निधन झाल्यास त्यांच्या कुटुंबियांकडून सदर घटनेनंतर कमाल सात दिवसाच्या आत शासकीय निवासस्थानात अनुज्ञेय कालावधीनंतरही अधिक वास्तव्य करण्याबद्दल संबंधित कार्यकारी अभियंता यांच्याकडे अर्ज प्राप्त झाला नसल्यास, संबंधित कार्यकारी अभियंता सदर शासकीय निवासस्थान त्वरीत (अनुज्ञेय कालावधी संपण्यापूर्वी) रिक्त करणेबाबत संबंधितांना सूचना/नोटीस देतील व त्यानुसार अंमलबजावणी करण्याची जबाबदारी त्यांची असेल.

७. शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचा राजीनामा किंवा सेवानिवृत्ती किंवा स्वेच्छानिवृत्ती किंवा त्यांची बदली झाल्यास संबंधित शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्याकडून किंवा शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना सेवेतून काढून टाकल्यास किंवा यांचे निधन झाल्यास त्यांच्या कुटुंबीयांकडून सदर शासकीय निवासस्थानात अनुज्ञेय कालावधीनंतरही अधिक वास्तव्य करण्याबद्दल विहित कालावधीत संबंधित कार्यकारी अभियंता यांच्याकडे अर्ज प्राप्त झाल्यास, सदर अर्जात नमूद केलेले कारण व शासकीय निवासस्थान मिळण्याबाबतची प्रतिक्षायादी तपासून, संबंधित अधीक्षक अभियंता यांच्या मंजूरीने, सदर शासकीय निवासस्थान उपरोक्त घटनेच्या दिनांकापासून पहिल्या तीन महिन्यापर्यंत ताब्यात ठेवण्याची परवानगी देण्यास संबंधित कार्यकारी अभियंता सक्षम असतील. सदर तीन महिन्यांपर्यंत शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: घभाव २०१०/प्र.क्र.४/सेवा-५, दिनांक १९ एप्रिल, २०११ मध्ये नमूद केल्यानुसार अथवा त्यामध्ये वेळोवेळी होणा-या सुधारणेनुसार अनुज्ञप्ती शुल्काची आकारणी करण्यात यावी.

उपरोक्त अनुज्ञेय कालावधीनंतरच्या तीन महिन्यांच्या कालावधीनंतरही सदर शासकीय निवासस्थानामध्ये वास्तव्य करण्याबाबत सदर कालावधी पूर्ण होण्याआधी अर्ज प्राप्त झाल्यास, व त्यावेळी संबंधित कार्यकारी अभियंता यांच्याकडील शासकीय निवासस्थान मिळणेबाबतच्या प्रतिक्षायादीनुसार शासकीय निवासस्थान मिळणेसाठी मागणी नसल्यास, सदर मागणी प्राप्त होईपर्यंत, संबंधित अधीक्षक अभियंता यांच्या मंजूरीने सदर शासकीय निवासस्थान अर्जदारास ताब्यात ठेवण्याची परवानगी देण्यास संबंधित कार्यकारी अभियंता सक्षम असतील. सदर प्रकरणी, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: घभाव २०१०/प्र.क्र.४/सेवा-५, दिनांक १९ एप्रिल, २०११ मध्ये नमूद केल्यानुसार अथवा त्यामध्ये वेळोवेळीहोणा-या सुधारणेनुसार अनुज्ञप्ती शुल्काची तसेच सेवेत असताना देय असलेल्या वेतनप्रमाणे अन्यथा सेवा समाप्तीपूर्वी त्याला देय असलेल्या घरभाडे भत्ता याची आकारणी करण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता सदर प्रकरणांची माहिती जिल्हा वाटप समितीचे अध्यक्ष तसेच शासनाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग यांना वेळोवेळी सादर करतील.

शासकीय निवासस्थान अर्जदारास अनुज्ञेय कालावधीनंतर ताब्यात ठेवण्याची परवानगी देताना, परवानगी आदेशात नमूद केलेल्या कालावधीनंतर सदर शासकीय निवासस्थान रिक्त करण्याबाबत, तसेच सदर दिनांकास शासकीय निवासस्थान रिक्त न केल्यास, परवानगी आदेशातील नमूद कालावधीनंतर शासन निर्णयातील तरतूदींनुसार दंडनीय दराने अनुज्ञप्ती शुल्काची आकारणी करण्यात येईल अशी सुचना/नोटीस देण्यात यावी.

८. उपरोक्त परिच्छेद क्रमांक ७ मध्ये नमूद केलेल्या कालावधीनंतर (शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवण्याच्या अनुज्ञेय कालावधीनंतरच्या तीन महिन्यांच्या कालावधीनंतर) शासकीय निवासस्थानात अधिक वास्तव्य केल्याबद्दल वित्त विभागाच्या दिनांक २४.०८.२००९ च्या शासन निर्णयान्वये वर्गीकरण केलेल्या शहरांतील शासकीय निवासस्थानांसाठी खालीलप्रमाणे दंडनीय दराने अनुज्ञप्ती शुल्काची आकारणी करण्यात यावी.

| अ.क्र. | शासकीय निवासस्थान | दंडनीय दराने अनुज्ञप्ती शुल्क |
|---|---|---|
| १. | 'एक्स' वर्गीकरण केलेल्या शहरांतील शासकीय निवासस्थानांसाठी | शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: शानिवा-२५११/प्र.क्र.२३९/११/२३-अ, दिनांक २९ जुलै, २०११ अन्वये अथवा त्यामध्ये वेळोवेळी होणा-या सुधारणेनुसार असणारे दंडनीय दराने अनुज्ञप्ती शुल्क |
| २. | 'वाय' वर्गीकरण केलेल्या शहरांतील शासकीय निवासस्थानांसाठी | प्रति चौ.फूट रु.३५/- या दंडनीय दराने अनुज्ञप्ती शुल्क |
| ३. | 'झेड' वर्गीकरण केलेल्या शहरांतील शासकीय निवासस्थानांसाठी ('एक्स' किंवा 'वाय' वर्गात समाविष्ट नसलेली शहरे / गावे ) | प्रति चौ.फूट रु.१५ /- या दंडनीय दराने अनुज्ञप्ती शुल्क |

९. शासकीय निवासस्थानात रहात असलेल्या शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचे त्याच गावात/शहरात स्वत:च्या/कुटुंबियांच्या मालकीचे निवासस्थान असल्याचे निदर्शनास आल्यास, सदर शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना वाटप केलेले सदर शासकीय निवासस्थान सदर घटनेच्या दिनांकानंतर अनुज्ञेय असणार नाही. अशा प्रकरणी सदर शासकीय निवासस्थान तात्काळ रिक्त करुन घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची असेल. शासकीय निवासस्थानात अनुज्ञेय कालावधीनंतरही शासकीय अधिकारी/कर्मचारी यांनी अधिक वास्तव्य केल्यास, सदर शासकीय निवासस्थानाचा ताबा सोडेपर्यंत दंडनीय दराने अनुज्ञप्ती शुल्काची आकारणी करण्यात यावी. हा नियम अभिहस्तांकीत शासकीय निवासस्थानांना लागू असणार नाही.

१०. उपरोक्त परिच्छेद क्रमांक ७ मध्ये नमूद केलेल्या कालावधीनंतर खालील अपवादात्मक परिस्थितीमध्ये गुणवत्तेनुसार, विशेष बाब म्हणून प्रति चौरस फुटास खालील प्रकरणांत नमूद केलेल्या दराने अनुज्ञप्ती शुल्काची आकारणी करुन, नमूद कालावधीसाठी शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवण्यास सवलत देण्याचे अधिकार फक्त शासनाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग यांना राहतील :-

अ) शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांची शैक्षणिक वर्षात मध्येच बदली झाल्यास आणि त्याचे पाल्य त्याच अथवा लगतच्या पुढील शैक्षणिक वर्षात १० वी किंवा १२ वीच्या बोर्डाच्या परीक्षेकरिता बसणारअसल्यास, सदर कारणास्तव उपरोक्त अनुक्रमांक-७ नुसार शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवण्यास संबंधित कार्यकारी अभियंता यांनी परवानगी दिली असल्यास, सदर कालावधी संपण्याआधी अर्जदाराकडून संबंधित कार्यकारी अभियंता यांना पुढील कालावधीसाठी शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवण्यासाठी अर्ज प्राप्त झाल्यास, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : घभाव- २०१०/प्र.क्र. ४/सेवा-५, दिनांक १९ एप्रिल, २०११ व त्यामध्ये वेळोवेळी होणा-या सुधारणानुसार, त्याला आकारल्या जाऊ शकणा-या अनुज्ञप्ती शुल्काच्या दुप्पट दराने अनुज्ञप्ती शुल्काची आकारणी करून, सदर पाल्याचे १० वी किंवा १२ वी चे शैक्षणिक वर्ष संपेपर्यंतच्या कमाल कालावधीपर्यंत शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवण्यास सवलत अनुज्ञेय असेल.

ब) शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचे सेवेत असताना निधन झाल्यास आणि उपरोक्त अनुक्रमांक-७ नुसार शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवण्यास संबंधित कार्यकारी अभियंता यांनी परवानगी दिली असल्यास, सदर कालावधीतही मृत कर्मचारी यांच्या कुटुंबियांची प्रयत्न करुन सुध्दा पर्यायी निवासस्थानाची व्यवस्था न झाल्यास, सदर कालावधी संपण्याआधी अर्जदाराकडून संबंधित कार्यकारी अभियंता यांना पुढील कालावधीसाठी शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवण्यासाठी अर्ज प्राप्त झाल्यास, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : घभाव- २०१०/प्र.क्र. ४/सेवा-५, दिनांक १९ एप्रिल २०११ व त्यामध्ये वेळोवेळी होणा-या सुधारणानुसार, त्याला आकारल्या जाऊ शकणा-या अनुज्ञप्ती शुल्काच्या दुप्पट दराने अनुज्ञप्ती शुल्काची आकारणी करून, उपरोक्त परिच्छेद क्रमांक ७ मध्ये नमूद केलेल्या कालावधीसह कमाल नऊ महिन्याच्या कालावधीपर्यंत किंवा त्यांच्या कुटुबीयांस पर्यायी निवासस्थान मिळेपर्यंत, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवण्यास सवलत अनुज्ञेय असेल.

क) शासकीय निवासस्थानात राहणा-या शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना अनुज्ञेय कालावधीनंतरही स्वत:च्या अथवा त्याच्या कुटुंबातील व्यक्तीच्या [महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियमान्वये कुटुंबाच्या व्याख्येनुसार], शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक: एमएजी-२००५/९/प्र.क्र.१/आरोग्य-३, दिनांक १९ मार्च, २००५ मध्ये, अथवा त्यामध्ये वेळोवेळी होणा-या सुधारणेनुसार, नमूद केलेल्या गंभीर आजारपणाच्या कारणास्तव, अनुज्ञेय कालावधीनंतर कमाल सात दिवसाच्या आत, शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवण्यासाठी संबंधित कार्यकारी अभियंता यांच्याकडे अर्ज प्राप्त झाल्यास, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : घभाव- २०१०/प्र.क्र.४/सेवा-५, दिनांक १९ एप्रिल २०११ व त्यामध्ये वेळोवेळी होणा-या सुधारणानुसार, त्याला आकारल्या जाऊ शकणा-या अनुज्ञप्ती शुल्काच्या दुप्पट दराने अनुज्ञप्ती शुल्काची आकारणी करून, आधीच्या तीन महिन्याचा कालावधीसह कमाल सहा महिन्याच्या कालावधीपर्यंत शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवण्यास सवलत अनुज्ञेय असेल.

११. उपरोक्त परिच्छेद क्रमांक ७ मध्ये नमूद केलेल्या कालावधीनंतर अर्जदारास शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवण्याची परवानगी देताना, परवानगी आदेशात नमूद केलेल्या कालावधीत शासन निर्णयातील तरतूदींनुसार दंडनीय दराने आकारण्यात येणा-या अनुज्ञप्ती शुल्काबाबत, तसेच परवानगी आदेशातील नमूद कालावधीनंतर कोणत्याही परिस्थितीत सदर शासकीय निवासस्थान रिक्त करणेबाबत सूचना/नोटीस देण्यात यावी.

१२. या शासन निर्णयान्वये अनुज्ञप्ती शुल्काची आकारणी करण्यास संबंधित कार्यकारी अभियंता सक्षम असतील. शासकीय निवासस्थान वेळीच रिक्त करुन घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी

अभियंता यांची असेल. विहीत कालावधीनंतर कार्यकारी अभियंता संबंधित प्राधिका-यांमार्फत अथवा त्यांच्या सहकार्याने शासकीय निवासस्थानाच्या निष्कासनाबाबत कार्यवाही पूर्ण करतील. शासकीय निवासस्थानाबाबत अद्ययावत माहिती संबंधित कार्यकारी अभियंता दरमहा तसेच, संबंधित जिल्हा वाटप समितीचे अध्यक्ष मागणी करतील तेव्हा जिल्हा वाटप समितीचे अध्यक्षांना सादर करतील.

१३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : टिआरएफ-२०००/प्र.क्र.३/बारा, दिनांक ६ ऑगस्ट, २००२ व आदिवासी विकास विभागाच्या क्र. आस्था १७०१/प्र.क्र.४३/कार्यासन १५, दि.०६.०५.२००२ मध्ये नमूद केल्यानुसार अथवा त्यामध्ये वेळोवेळी होणा-या सुधारणांनुसार, तसेच, शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : शानिवा-१५९३/४४३३/प्र.क्र.६६७/९३/२३-अ, दिनांक ५ नोव्हेंबर, १९९३ अन्वये शासकीय निवासस्थानासंदर्भात देण्यात आलेल्या सवलती लागू असतील.

१४. हा शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येईल. तथापि, सदर दिनांकास वसूली प्रलंबित असलेल्या सर्व प्रकरणांनाही हा शासन निर्णय लागू करण्यात यावा, मात्र ज्या प्रकरणी वसुली पूर्ण झाली आहे, अशी प्रकरणे नव्याने सुरु करण्यात येवू नयेत. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २६ / सेवा ५, दिनांक ५ जून, २०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०६१५१५४६१०३५१८ असा आहे. हाआदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Bhaskarrao Gadge

Digitally signed by Rajendra Bhaskarrao Gadge
DN: CN = Rajendra Bhaskarrao Gadge, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.15 15:54:24 +05'30'

( आर. बी. गाडगे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२) मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५) मुख्य सचिव,
६) सर्व मंत्रालयीन विभागांचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
७) सर्व मंत्रालयीन विभाग,
८) वित्त विभाग /
९) प्रबंधक, मूळ शाखा, बॉम्बे उच्च न्यायालय, मुंबई,
१०) प्रबंधक, अपील शाखा, बॉम्बे उच्च न्यायालय, मुंबई,
११) प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१२) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई / नागपूर / औरंगाबाद,
१३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१४) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,

१५) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद) मुंबई,
१६) राज्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१७) राज्य मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१८) महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
१९) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
२०) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
२१) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
२२) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
२३) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
२४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
२६) मुख्य लेखा परिक्षक (निवासी लेखे), कोकण भवन, नवी मुंबई,
२७) सर्व विभागीय आयुक्त,
२८) सर्व जिल्हाधिकारी / निवासी उप जिल्हाधिकारी,
२९) सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
३०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
३१) निरनिराळ्या मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
३२) सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व कार्यासने,
३३) निवडनस्ती.